दै. महाराष्ट्र टाईम्स
शुक्रवार दि. १ जून २०१८

## फन टाइम

**बाबा :** बेटा, नापास झालास म्हणून निराश होऊ नकोस. नापास होणं तुझ्या नशिबातच लिहिलं होतं.

**बेटा :** हो ना बाबा... बरं झालं, वर्षभर अभ्यास केला नाही ते! सगळी मेहनत वाया गेली असती...

परंपरा आरमाराची भाग ८

अनिकेत यादव

# सेखोजी व संभाजी आंग्रे

बालमित्रांनो,
मागील भागात आपण पाहिले, की नव्याने स्थापन केलेल्या नौदलाचा पाया छत्रपती शिवाजी महाराजांनी रचला आणि कान्होजी आंग्रे यांनी स्वपराक्रमाने त्यावर इमारत उभी केली. कान्होजी आंग्रे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मुलांनी या इमारतीवर पताका उभारण्याचे अद्वितीय काम केले. कान्होजी आंग्रे यांना सहा मुले होती. इ. स. १७२९ मध्ये कान्होजींच्या मृत्यूनंतर त्यांचे ज्येष्ठ पुत्र सेखोजी हे मराठा आरमाराचे प्रमुख म्हणजे 'सरखेल' झाले. त्या वेळी सेखोजींचे वय होते अवघे २४ वर्षे आणि त्या वेळी चारही बाजूंनी शत्रूने त्यांना घेरले होते. कान्होजींच्या मृत्यूमुळे आतापर्यंत दबून राहिलेले इंग्रज, पोर्तुगीज, डच, सिद्दी, वाडीकर सावंत हे मराठ्यांचे आरमार संपविण्यासाठी टपून बसले होते. या सर्वांशी लढा देणे म्हणजे फार मोठी परीक्षाच होती. सेखोजींनी छत्रपती थोरले शाहू महाराज व श्रीमंत थोरले बाजीराव पेशवे यांच्याशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित करून या सर्वांशी कडवी झुंज दिली. सिद्दीकडे असणारा कोकणातील बराचसा प्रांत जिंकून घेण्यात आला. स्वराज्याची राजधानी असणारा 'रायगड' किल्ला त्या वेळी सिद्दीच्या ताब्यात होता. तोदेखील छत्रपती, पेशवे, प्रतिनिधी व आंग्रे यांनी एकत्रित व्यूहरचना करून जिंकून घेतला. सिद्दीच्या जंजिऱ्यावरदेखील चौफेर हल्ला करण्यात आला. या सर्व मोहिमांमध्ये सेखोजी आंग्रेंसोबत



त्यांचे बंधू व त्यांची आई मथुराबाई यांनीदेखील हिरीरीने सहभाग घेतला. मात्र, सततच्या मोहिमा, दगदगीमुळे इ. स. १७३३ मध्ये सेखोजींचे निधन झाले.

सेखोजींनंतर मराठा आरमाराचे दोन भाग करण्यात आले. कान्होजी आंग्रे यांच्या मुलांपैकी संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे या दोन भावांमध्ये ही विभागणी करण्यात आली. मानाजी आंग्रे यांनीदेखील शत्रूच्या ताब्यात असणारी महत्त्वाची ठाणी जिंकून घेतली होती व पोर्तुगीजांच्या विरुद्ध झालेल्या लढाईत त्यांच्या आरमाराचा धुव्वा उडविला होता.

संभाजी आंग्रे यांनी तर विशेष पराक्रम गाजविला. पोर्तुगीज, इंग्रज, डच, सिद्दी या परकीयांच्या जहाजांना त्यांनी सळो की पळो करून सोडले होते. परवाना न घेतलेल्या या परकीयांची जहाजे पकडून, त्यांच्याकडून जबरदस्तीने दंड वसूल करण्यात येई. शिवरायांच्या काळी ज्या परकीय सत्ताधाऱ्यांकडून आपल्या जहाजांना परवानगी घ्यावी लागत असे, त्याच परकीयांना आता परवाना घेणे संभाजी आंग्रे यांनी बंधनकारक केले होते. चिडलेल्या युरोपियनांनी अनेक वेळा संभाजी आंग्रेंना व त्यांचे आरमार संपविण्याचा प्रयत्न केला. मात्र, ते त्यांना कधीही शक्य झाले नाही. वास्तविक पाहता त्या वेळी इंग्रज, पोर्तुगीज, डच हे समुद्रावरील अनभिषिक्त सम्राट होते. त्यांच्याशी समुद्रावर लढा देणे ही बाब फार कठीण होती. यामुळे हे युरोपियन आंग्रेंना 'पायरेट' (समुद्री चाचे) म्हणू लागले. आपल्याच समुद्रावर संचार करण्यासाठी या परकीयांची परवानगी घ्यावी लागणे म्हणजे एक प्रकारची 'गुलामगिरीच' होती आणि ती 'गुलामगिरी' आंग्रेंनी साफ धुडकावून लावली.





चित्र : अतुल बेलोकर / मांडणी : जगेश टेकवडे